उपजिल्हा रूग्णालय, शिरोडा, जि.सिंधुदुर्ग येथील विविध इमारत दुरूस्ती व बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१५/ प्र.क्र.७७/ आरोग्य-४.

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ४ जुन, २०१५.

**वाचा**

१) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे-६/बांध.शिरोडादुरू/३-२१६०-६२/ १५,दि.२५.०२.२०१५.**

**प्रस्तावना**

उपसंचालक, आरोग्य सेवा कोल्हापूर मंडळाच्या अधिनस्त उपजिल्हा रूग्णालय, शिरोडा, जि.सिंधुदुर्ग येथील विविध इमारत दुरूस्तीच्या ७ कामांचे एकूण रु.६४,५९,०००.०० ( अक्षरी रूपये चौसस्ट लक्ष एकोणसाठ हजार मात्र ) इतक्या किंमतीचे अंदाजपत्रक व आराखडे प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेसाठी शासनास सादर प्राप्त झाले आहेत. सदर अंदाजपत्रक व आराखडे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारीत आहेत. सदर अंदाजपत्रकांतील कामांना अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी प्रमाणित केलेले आहेत. तसेच वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रूग्णालय, शिरोडा व जिल्हा शल्य चिकित्सक, सिंधुदुर्ग यांनी साक्षांकित केलेले आहेत. या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

उपजिल्हा रूग्णालय, शिरोडा, जि.सिंधुदुर्ग येथील विविध इमारत दुरूस्तीच्या एकूण ७ अंदाजपत्रकांतील कामांचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे.

| Sr.No. | Name of Work | Amount |
|---|---|---|
| 1. | Repairs to Rural hospital building (Plaster & Painting ) | 9,64,763.00 |
| 2. | Water proofing to Rural hospital building | 4,80,847.00 |
| 3. | Repairs to existing internal roads in campus | 14,98,854.00 |
| 4. | Providing concrete paved surface in campus | 16,54,297.00 |
| 5. | Repairs to sanitary arrangement in campus | 2,06,893.00 |
| 6. | Construction of storm water gutter and pipe laying | 8,85,683.00 |
| 7. | Construction of shed | 3,56,786.00 |

| Sr.No. | Name of Work | Amount |
|---|---|---|
| **(A)** | **Sub Total** | **60,48,123.00** |
| | Add for repairs to internal electrification for building work (on sub estimates 1 and 7= 13,21,549.00 X 4 percent) | 52862.00 |
| | Add for repairs to street lighting Lump sum | 50,000.00 |
| | **(B) Total** | **61,50,985.00** |
| | Add for price escalation 5 % of ( B ) | **3,07,549.00** |
| | **Total** | **64,59,000.00** |

उपरोक्त उपजिल्हा रूग्णालय, शिरोडा, जि.सिंधुदुर्ग येथील विविध इमारत दुरूस्तीच्या ७ कामांच्या एकूण रु.६४,५९,०००.०० ( अक्षरी रूपये चौसस्ट लक्ष एकोणसाठ हजार मात्र ) इतक्या रक्कमेपैकी भाववाढीची तरतूद वगळण्यात येत असून एकूण रूपये ६१,५०,९८५/-( अक्षरी रूपये एकसस्ट लक्ष पन्नास हजार नऊशे पंच्याऐंशी मात्र ) एवढ्या रक्कमेस खालीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) या कामांसाठी निविदा मागविण्याआधी सदर कामांकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिका-यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करूनच काम हाती घ्यावे.

३) निधी अर्थसंकल्पित झाल्याशिवाय कामास सुरूवात करण्यात येऊ नये.

४) निधी उपलब्धतेबाबतचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

सदर बांधकामांवरील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध करून देण्यात यावा.

**मागणी क्र. एच-८**

| | |
|---|---|
| ४२१०- | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०१- | नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य ) |
| ११०- | रूग्णालये व दवाखाने |
| (१)(अ)- | पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-इमारती |
| (००) (०१)- | मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ ) |
| ५३- | मोठी बांधकामे |

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५८/ इमा-३,दि.२०.०३.२०१५ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार व वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच

मधील अनुक्रमांक १० परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०४१२५३०१५५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.06.04 14:11:21 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, सिंधुदुर्ग.
७. अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, सिंधुदुर्ग.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
१०. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.